**प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक घटकाची सन २०१८-१९ मध्ये राज्यात अंमलबजावणीसाठी रु.७८९४१ लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आणि सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.७६४४ लक्ष निधी वितरीत करणे.....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुसिंयो- ०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १९ जून, २०१८

**वाचा-**

१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक- पाणी व्यवस्थापन पुरक बाबी (Volume-II) च्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
३) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.०३१८/प्र.क्र.८१/१४-अे, दि.२ एप्रिल, २०१८
४) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.०४१८/प्र.क्र.१११/१४-अे, दि. ११ एप्रिल, २०१८.
५) कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि.२७ एप्रिल, २०१८
६) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१७-२/२०१८-आरएफएस-III, दि.१० एप्रिल, २०१८.
७) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१८-१२/२०१८-आरएफएस-III, दि.२९ मे, २०१८ (तीन पत्रे).

**प्रस्तावना:**

सन २०१३-१४ पर्यंत केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना, राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन अभियान म्हणून राबविण्यात येत होती. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ८०:२० असे होते. सन २०१४-१५ या वर्षात सदर योजना, केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत - शेतावरील पाणी व्यवस्थापन उप अभियान म्हणून राबविण्यात आली. सदरहू उप अभियानामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ८०:२० असे होते. सन २०१५-१६ पासून, केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक (सुक्ष्म सिंचन) या घटकांतर्गत राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०: ४० असे आहे.

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत, सन २०१७-१८ पर्यंत, प्रति थेंब अधिक पीक घटकाखाली सुक्ष्म सिंचन व इतर घटक असे दोन उपघटक स्वतंत्रपणे राबविण्यात येत होते. सदर दोन घटकासाठी निधी सुध्दा स्वतंत्रपणे उपलब्ध करुन देण्यात येत होता. केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र. ६ येथील दि. १० एप्रिल, २०१८ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्यासाठी प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक घटकाची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी रु.४८००० लाख नियतव्यय मंजूर केला आहे व यामधील रु.४०००० लाख निधी सूक्ष्म सिंचनासाठी व रु.८००० लाख निधी पाणीसाठे निर्मिती व जलसंवर्धनाच्या (Water Harvesting/ Water Conservation) कामावर खर्च करण्याचे सुचित केले व त्यानुसार वार्षिक कृती आराखडा तयार करुन

राज्यस्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) मान्यतेने सादर करण्याबाबत कळविले. तथापि, पाणीसाठे निर्मिती व जलसंवर्धनाची कामे स्वतंत्रपणे न राबविता सुक्ष्म सिंचनाशी संलग्न (Integrated with Micro Irrigation) राबविण्यात यावीत अशाही सूचना केंद्र शासनाने दिल्या.

इतर उप घटकाचे नामांतरण “पाणीव्यवस्थापन पुरक बाबी” असे करुन सदर उप घटकाच्या मार्गदर्शक सूचना सुध्दा निर्गमित केल्या आहेत. त्यामध्ये पाणीसाठे व जलसंवर्धनांतर्गत अनुज्ञेय बाबीं, त्यावरील अनुज्ञेय खर्च व अनुदान मर्यादा विहित केली आहे. त्यानुसार, तयार केलेल्या सुक्ष्म सिंचनाच्या रु.६५६०८ लाख (केंद्र हिस्सा रु. ४०००० लाख व राज्य हिस्सा रु. २५६०८ लाख ) व पाणी व्यवस्थापण पुरक बाबी उप घटकाच्या रु. १३३३३ लक्ष (केंद्र हिस्सा रु. ८००० लाख व राज्य हिस्सा रु. ५३३३ लाख) अशा एकूण रु. ७८९४१ लाख रक्कमेच्या कार्यक्रमास राज्यस्तरीय मान्यता समितीने (SLSC) दि.२५ मे, २०१८ च्या बैठकीत मान्यता दिली.

केंद्र शासनाने संदर्भाधीन अनु.क्र.७ येथील दि. २९ मे,२०१८ च्या पत्रान्वये प्रति थेंब अधिक पीक घटकासाठी रु.९८०० लाख निधीचा पहिल हप्ता वितरीत केला आहे. सदर निधीचा प्रवर्गनिहाय व उप घटक निहाय तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | प्रवर्ग | सुक्ष्म सिंचन | पाणी व्यवस्थापन बाबीं | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | सर्वसाधारण | ६३७१ | १२७३ | ७६४४ |
| २. | अनुसूचित जाती | ९८० | १९६ | ११७६ |
| ३. | अनुसूचित जमाती | ८१७ | १६३ | ९८० |
| | एकूण | ८१६८ | १६३२ | ९८०० |

त्यानुसार, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या रु.७८९४१ लाख रक्कमेच्या वार्षिक कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याचा व सर्वसाधारण प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा रु. ७६४४ लाख निधी आयुक्त कृषी यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

**<u>१. मंजूर कार्यक्रमः-</u>**

१.१. प्रधान मंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पिक घटकाची सन २०१८-१९ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी, केंद्र हिस्सा रु.४८००० लाख (अक्षरी रु. चारशे ऐंशी कोटी फक्त) व त्यास पूरक राज्य हिस्सा रु.३०९४१ लाख (अक्षरी रुपये तीनशे नऊ कोटी एकेचाळीस लाख फक्त) अशा एकूण रु. ७८९४१ लक्ष (अक्षरी रु. सातशे ऐकोणनव्वद कोटी एकेचाळीस लाख फक्त) निधीच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१.२. सदर मंजूर आराखडयाचा उप घटकनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रु.लाखात)

| अ.क्र. | उप घटकांचे नाव | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | सुक्ष्म सिंचन | ४०००० | २५६०८ | ६५६०८ |
| २. | पाणी व्यवस्थापन पुरक बाबीं | ८००० | ५३३३ | १३३३३ |
| | एकूण | ४८००० | ३०९४१ | ७८९४१ |

१.३. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक घटकासाठी राज्य हिश्श्याचा निधी, जिल्ह्यांचे जिल्हा नियोजन समितीमार्फत वितरीत करण्यात येतो. याबाबतची कार्यपध्दती राज्य शासनाच्या नियोजन विभागाचा शासन निर्णय क्र.जिवायो-१००७/प्र.क्र.३९/कार्यासन-१४१४, दि. १६ फेब्रुवारी, २००८ अन्वये निश्चित करण्यात आली आहे. सदरहू शासन निर्णयानुसार, उपरोक्त मान्यतेनुसार राज्य हिश्शाचा आवश्यक निधी जिल्हास्तरावर उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी.

१.४. सन २०१८-१९ या वर्षात उपलब्ध होणारा निधी, सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात व या योजनेतील पूर्व परवानगीने बसविण्यात आलेल्या संचासाठीच वापरण्यात यावा.

<u>२.वित्तीय मान्यता :-</u>

२.१. उपरोक्त अुनक्रमांक.१.१ व १.२ येथील प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन, सन २०१८-१९ या वर्षात प्रति थेंब अधिक पीक घटकाची सर्वसाधारण प्रवर्गासाठी अमलबजावणी करण्यासाठी रु.७६४४ लाख निधी वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) आयुक्त कृषी यांना वितरीत करण्यात येत अहे.

२.२. सदर निधीपैकी रु. ६३७१ लक्ष (अक्षरी रुपये त्रेसष्ट कोटी एकाहात्तर लाख फक्त) निधी सूक्ष्म सिंचनासाठी व रु.१२७३ लाख (अक्षरी रुपये बारा कोटी त्र्याहत्तर लाख फक्त) निधी पाणी व्यव्यस्थापन पुरक बाबीच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अनुज्ञेय बाबीवर खर्च करण्यात यावा.

२.३. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ च्या मंजुर तरतुदीत भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-३,
२४०१, पिक संवर्धन,
११३ कृषि अभियांत्रिकी
(००)(०७) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - (सूक्ष्म सिंचन) (केंद्र हिस्सा),
(२४०१२५०४),
३३ अर्थसहाय्य

२.४. केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात राज्य हिश्श्याचा आवश्यक निधी जिल्हा विकास निधीमधून उपलब्ध करुन घेण्याची कार्यवाही संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांनी करावी.

**३.योजनेची व्याप्ती :-**

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक घटकाची अमलबजावणी मुंबई व मुंबई उपनगर जिल्हे वगळून राज्यातील उर्वरित संपूर्ण ३४ जिल्ह्यात करण्यात यावी.

**४.पात्र लाभार्थी:-**

खालील अटींची पूर्तता करणारे शेतकरीच सदर योजनेचा लाभ घेण्यास पात्र असतील:-

४.१ शेतकऱ्यांच्या नावे मालकी हक्काचा ७/१२ व ८-अ उतारा असावा.

४.२ सूक्ष्म सिंचन उपघटकाचा तसेच पाणी व्यवस्थापण पुरक बाबी उप घटकांतर्गत पंपसंच, डिझेल इंजिन, सोलार इंजिन इ. बाबीचा लाभ घेणाऱ्या शेतकऱ्याकडे सिंचनाची सुविधा उपलब्ध असावी व त्याची नोंद ७/१२ उताऱ्यावर असावी. ७/१२ उताऱ्यावर सिंचनाच्या सुविधेबाबतची नोंद नसल्यास विहीर किंवा शेततळ्याबाबत शेतकऱ्याकडून स्वयं घोषणापत्र घेण्यात यावे. इतर साधनाव्दारे (बंधारे/कॅनॉल) सिंचनाची व्यवस्था असल्यास संबंधित (जलसंधारण/जलसंपदा) विभागाच्या अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र शेतकऱ्याकडून घेण्यात यावे.

४.३ सामुहिक सिंचनाची सुविधा उपलब्ध असल्यास इतर संबधितांचे करारपत्र असावे.

४.४ विद्युत पंपाकरिता कायमस्वरुपी विद्युत जोडणी असावी. त्या पृष्ठ्यर्थ शेतकऱ्यांकडून मागील नजीकच्या काळाची विद्युत बिलाची प्रत प्रस्तावासोबत घेण्यात यावी. सोलर पंपाची व्यवस्था असल्यास सोलर पंप बसवून घेतल्याबाबतचे पत्र व सोलर पंपाबाबतची कागदपत्रे प्रस्तावा सोबत घेण्यात यावीत.

४.५ शेतकऱ्याकडे आधारकार्ड असणे आवश्यक आहे.

४.६ एखादा लाभधारक योजनेत सहभागी होण्यास पात्र आहे, मात्र त्याच्याकडे आधार क्रमांक नाही, अशा लाभधारकांना आधार क्रमांक प्राप्त होईपर्यंत, आधार नोंदणी पावती/मतदार ओळखपत्र/पॅन कार्ड/ पासपोर्ट/ रेशनकार्ड/शासकीय कर्मचारी असल्यास ओळखपत्र/बँक किंवा पोस्ट ऑफिस पासबूक/मनरेगा कार्ड/किसान फोटो यापैकी पूरावा सादर केल्यास योजनेचा लाभ देण्यात यावा.

४.७ अनुदानाची रक्कम थेट शेतकऱ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात PFMS प्रणालीद्वारे जमा करण्यता यावी.

४.८ पात्र शेतकऱ्यास ५ हेक्टर क्षेत्राच्या मर्यादेत लाभ देण्यात यावा. मात्र सन २०१७-१८ पूर्वी ज्या क्षेत्रावर मागील १० वर्षाच्या कालावधीत सुक्ष्म सिंचनाचा लाभ घेतला असेल अशा क्षेत्रावर लाभ अनुज्ञेय असणार नाही. तशाप्रकारचे "लेखी निवेदन" शेतकऱ्याकडून घेण्यात यावे. त्याचप्रमाणे तालुका कृषी अधिकारी कार्यालयातील नोंदीवरुन त्याची प्रत्यक्षात खात्री करुन घेण्यात यावी. याबाबतची खातरजमा करण्याची संपूर्ण जबाबदारी कृषी सहायक / कृषी पर्यवेक्षक/ तालुका कृषी अधिकारी यांची राहील.

## ५.देय अनुदान:-

५.१. सूक्ष्म सिंचन :-

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदर योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना देय असलेले अनुदान खालीलप्रमाणे असेल:

अल्प व अत्यल्प भूधारक शेतकरी - ५५ %
इतर शेतकरी - ४५ %

५.२. पाणी व्यवस्थापन पुरक बाबी -

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक घटकांर्गत, पाणी व्यस्थापन पुरक बाबी उपघटकाच्या मार्गदर्शक सूचना मधील Annexure-XV मध्ये नमूद बाबींसाठी ठरवून दिलेल्या खर्च प्रमाणकानुसार विहीत मर्यादेत अनुदान अनुज्ञेय राहिल.

## ६.योजनेची अमलबजावणी :-

६.१. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत सुक्ष्म सिंचन संच बसविण्यासाठी सन २०१८-१९ या वर्षात शेतकऱ्यांकडून ऑनलाईन प्रणालीद्वारे अर्ज स्विकारण्यास या विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र.३ व ४ येथील अनुक्रमे दि.२ एप्रिल, २०१८ व दि.११ एप्रिल, २०१८ च्या पत्रान्वये कृषी आयुक्तालयास परवानगी दिलेली आहे. त्यानुसार कृषी आयुक्तालयाने अर्ज घेण्यास सुरवात केली आहे. तरीसुध्दा सूक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापन बाबीं उप घटकांतर्गत राबवावयाच्या बाबींना प्रसिध्दी देण्याच्या दृष्टीकोनातून सदर योजनेंतर्गत लाभार्थ्यांकडून अर्ज प्राप्त करुन घेण्यासाठी योजनेस ऑल इंडिया रेडीओ/ दूरदर्शन व लोकराज्य अंक यांच्या माध्यमातून तसेच एस.एम.एस.द्वारे, ग्रामपंचायतींच्या नोटीस बोर्डवर, कृषी सहायक, कृषी पर्यवेक्षक, मंडळ कृषी अधिकारी, उपविभागीय कृषी अधिकारी, तालुका कृषी अधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, पंचायत समिती, तहसील व जिल्हा परिषद या कार्यालयांमध्ये दर्शनी भागावर माहिती पत्रके लावून योजनेस व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. माहिती पत्रकामध्ये अर्ज ई-ठिबक प्रणालीव्दारे ऑनलाईन पध्दतीने स्विकारणे, योजनेचा लाभ घेण्यासाठी आवश्यक असलेल्या अटी व शर्ती, अर्जदाराने अर्जासोबत सादर करावयाची कागदपत्रे यांचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

६.२. प्रशासकीय मान्यतेच्या मंजूर कार्यक्रमाच्या मर्यादेत कृषी आयुक्तालयाने जिल्ह्यांना लक्षांक ठरवून द्यावेत.

६.३. शेतकऱ्यांकडून अर्ज फक्त ई-ठिबक आज्ञावलीमध्ये ऑनलाईन प्रणालीव्दारेच स्विकारण्यात यावेत.

६.४. सूक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापण बाबीं या उप घटकासाठी वैयिक्त लाभार्थ्यांकडून स्वतंत्र अर्ज ऑनलाईन प्रणालीवर स्विकारण्यात यावेत.

६.५ अर्ज स्विकारण्यासाठी खालील प्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

I. प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत ऑनलाईन अर्ज करु इच्छिणाऱ्या अर्जदाराने सर्वप्रथम स्वत:ची नोंदणी करुन घ्यावी, नोंदणीमध्ये पुढील बाबी नमूद कराव्यात:-

अ) स्वत:चे नाव व पत्ता (पीन कोडसह) (बँकेच्या पासबुक व आधार कार्डवर दर्शविल्याप्रमाणे)
आ) आधार कार्ड क्रमांक
इ) बँक खाते क्रमांक

ई) मतदान ओळखपत्र क्रमांक (असल्यास)

उ) पॅन क्रमांक (असल्यास)

ऊ) मोबाईल क्रमांक

ए) ई-मेल आय डी (असल्यास)

II. नोंदणी झाल्यानंतर अर्जदाराच्या मोबाईल/ई-मेल वर गोपनीय क्रमांक (secret code) पाठवून ती बरोबर असल्याची खात्री करण्यात यावी.

६.६. अर्जदाराने स्वत:ची नोंदणी केल्यानंतर अर्ज करण्याची प्रक्रिया सुटसुटीत असावी. त्यामध्ये मी सुक्ष्म सिंचन संच बसविलेला नाही व पूर्वसंमती मिळाल्याशिवाय बसविणार नाही, अशाप्रकारच्या प्रमाणपत्राचा समावेश असेल.

६.७. अर्ज पूर्ण भरुन झाल्यानंतर तो बरोबर असल्याची खात्री करणेकरिता view व Print ची सुविधा असेल. एकदा लाभार्थ्यांने अर्ज submit केल्यानंतर त्यात बदल करण्याची सुविधा असणार नाही.

६.८. लाभार्थी नोंदणी ते लाभार्थ्यांच्या बँक खात्यावर अनुदानाची रक्कम वर्ग करण्यापर्यंतच्या कार्यवाहीबाबत महत्वाच्या वेगवेगळ्या टप्प्यावर लाभधारकास एकूण ४ ते ५ एस.एम.एस.व्दारे वेळोवेळी कळविण्यात यावे.

६.९. लाभार्थी शेतकऱ्यांना ई-ठिबक आज्ञावलीमध्ये युजर आयडी व पासवर्ड द्यावा. दुबार अर्जाची नोंदणी टाळण्यासाठी मोबाईल नंबरच्या माध्यमातून वन टाईम पासवर्ड द्यावा.

६.१०. लाभार्थ्यांने ऑनलाईन अर्ज सादर केल्यानंतर स्वयंचलित संगणकीय प्रणालीद्वारे शेतकऱ्यांना चालू वर्षी योजनेंतर्गत मंजूर कृती आराखडयाच्या १००% मर्यादेत (भौतिक व आर्थिक) ऑनलाईन पूर्वसंमती देण्यात यावी.

६.११. सूक्ष्म सिंचन संच बसविण्यासाठी पुर्वमान्यता प्राप्त झाल्यांनतर, लाभार्थी शेतकऱ्याने पूर्व मान्यता प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मधील अनुक्रमांक ३ येथील नमूद कालावधीत, कृषी आयुक्तालयाकडे नोंदणीकृत असलेल्या सुक्ष्म सिंचन संच उत्पादक अथवा त्यांचे प्राधिकृत विक्रेते/वितरकाकडून त्यांच्या पसंतीच्या कंपनीचा संच खरेदी करावा व प्रत्यक्षात त्यांच्या क्षेत्रावर कार्यान्वित करुन बील ईनव्हाईस व अनुदान मागणीचा प्रस्ताव आवश्यक अभिलेखांच्या प्रतीसह ऑनलाईन प्रणालीद्वारे सादर करावा.

६.१२ लाभार्थी शेतकऱ्यांने पूर्व मान्यता मिळाल्यानंतर, सुक्ष्म सिंचन संचाची उभारणी करुन विहीत कालावधीत बील ईनव्हाईस व अनुदान मागणीचा प्रस्ताव आवश्यक अभिलेखांच्या प्रतिसह ऑनलाईन प्रणालीमध्ये न भरल्यास त्याची पूर्व मान्यता संगणकीय प्रणालीद्वारे आपोआप रद्द होईल .तथापि, त्यास पुन्हा नव्याने अर्ज करण्याची संधी उपलब्ध राहिल .

६.१३. पुर्वसंमती प्राप्त अर्जदाराने सुक्ष्म सिंचन संच बसवून बील ईनव्हाईस व अनुदान मागणीचा प्रस्ताव आवश्यक अभिलेखांच्या प्रतिसह ऑनलाईन प्रणालीवर सादर केल्यानंतर, तालुका कृषी अधिकारी यांनी, प्रस्तावाची, कागदपत्रांची/ अभिलेखांची तपासणी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मधील अ.क्र.४ मधील नमूद कालावधीत करावी व संबंधित पर्यवेक्षक यांना मोका तपासणीसाठी आदेशीत करावे.

.६.१४ संबंधित पर्यवेक्षकानी त्यांच्य कार्यक्षेत्रातील लाभार्थ्यांनी बसविलेल्या १००% प्रकरणाची मोका तपासणी या शासन निर्णया सोबतच्या परिशिष्ट" अ "मधील अ ५.क्र.मधील नमूद कालावधी करुन तपासणी अहवाल संगणकीय प्रणालीवर अपलोड करावा .

६.१५. मोका तपासणी अहवाल प्राप्त झाल्यानंतर, तालुका कृषि अधिकारी यांनी, संगणकीय प्रणालीद्वारे अनुदानाची परिगणना करुन, शेतकऱ्यांना अनुदान अदा करण्यासाठीचा प्रस्ताव जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांच्याकडे शिफारशीसह या शासन निर्णया सोबतच्या परिशिष्ट - अ मधील अ.क्र.६ मधील नमूद कालावधीत ऑनलाईन सादर करावा.

६.१६. तालुका कृषी अधिकारी यांच्याकडून अनुदानाची परिगणना करुन, अनुदान अदायगीसाठी ऑनलाईन प्रस्ताव प्राप्त झाल्यांनतर, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांनी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट - अ मधील अनु.क्र.७ मधील नमुद कालावधीत अनुदानाची रक्कम शेतकऱ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात PFMS प्रणलीद्वारे जमा करावी.

६.१७ पूर्व मान्यता न घेता शेतकऱ्याने सुक्ष्म सिंचन संचाची उभारणी केली असेल किंवा पाणी व्सवस्थापन घटकांतर्गत बाबीची खरेदी करुन/काम करुन अनुदानासाठीचा प्रस्ताव सादर केला असेल तर अशा शेतकऱ्यास अनुदान अनुज्ञेय असणार नाही.

६.१८. जिल्हा पातळीवरील अंमलबजावणी यंत्रणेने लाभार्थ्यांची निवड आणि अनुदानाचे वितरण पारदर्शक पध्दतीने व त्वरेने होईल याची खातरजमा करावी व सर्व ठिकाणी एकसमान पध्दती अवलंबिण्यात यावी.

६.१९. या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट- अ अन्वये ठरवून दिलेल्या वेळापत्रकानुसार योजनेची अंमलबजावणी करण्याची संपूर्ण जबाबदारी संचालक, फलोत्पादन यांची राहिल.

६.२०. तालुका/ जिल्ह्यास ठरवून दिलेल्या आर्थिक / भौतिक उद्दिष्टांएवढे अर्ज लाभार्थ्यांकडून विहित कालावधीत (योजनेची प्रगती पाहून अर्ज सादर करण्याची मुदत दि.१५ मार्च, २०१९ पर्यत वा अन्य कोणत्याही तारखे पर्यंत ) ऑनलाईन भरुन घेण्यासाठी तालुका कृषी अधिकारी / जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांनी व्यापक प्रयत्न करावेत.

**<u>७. योजना अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना-</u>**

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना राबविताना पुढील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७.१ केंद्र शासनाच्या योजनेंतर्गत सुक्ष्म सिंचन संचासाठी अनुदानाचा लाभ घेण्यासाठी शेतकऱ्यांनी कोणत्या सूक्ष्म सिंचन साहित्य उत्पादक कंपन्यांकडून सूक्ष्म सिंचन संच बसवून घ्यावेत त्या कंपन्यांची माहिती सार्वजनिक करण्यात यावी.

७.२ प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमधील परिच्छेद क्र.१४.१३ नुसार सन २०१८-१९ या वर्षासाठी सुक्ष्म सिंचन साहित्य उत्पादकांना स्वत:चे घटक निहाय दर आकारण्यास मान्यता देण्यात येत आहे. तथापि, कंपन्यांना वर्षांच्या सुरुवातीला सुक्ष्म सिंचन साहित्यांचे दर सादर करणे आवश्यक राहील. अनुदानासाठीची खर्च मर्यादा या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “ब” (ठिबक सिंचन) व परिशिष्ट “क” (तुषार सिंचन) प्रमाणे असेल.

७.३ सदर योजनेची अंमलबजावणी करताना केंद्र शासनाने प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) घटक, व पाणी व्यवस्थापन पुरक बाबी (Volume-II) घटकाच्या निर्गमित केलेल्या

संदर्भाधीन अनुक्रमे अ.क्र.१ व २ येथील मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन अ.क्र.५ येथील उन्नत शेती समृध्द शेतकरी अभियानाच्या दि.२७ एप्रिल,२०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन अनु.क्र.६व ७ येथील अनुक्रमे दि १०एप्रिल, २०१८ व दि. २९ एप्रिल, २०१८ कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाच्या पत्रातील अटी व शर्ती यांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७.४ प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजनेचा भर ठिबक व तुषार सिंचन, पाणी उपयोजन आणि वितरण व्यवस्था, दुय्यम साठवणूक आणि निचरा विकास यासारखे तंत्रज्ञान यथायोग्य विकसित करुन पाण्याचा काटकसरीने वापर करण्याची क्षमता वाढविण्यावर असेल.

७.५ शेतकऱ्यांवर भुर्दंड पडणार नाही अशा स्थळ आणि पिकनिहाय विनिर्दिष्ट तांत्रिक सिंचन यंत्रणा अवलंबण्यात यावी. (Cost Effective Micro Irrigation System) म्हणजेच भौगोलिक संरचना व पिकांचा प्रकार विचारात घेवून सिंचन संच बसवावा.

७.६ सुक्ष्म सिंचनासाठी फळबागा तसेच कृषी पिके यांच्यासाठीही अनुदान देण्यात येते. तथापि, मंजूर अनुदानापैकी कमीत कमी २५ % अनुदानाचा वापर पिक क्षेत्रासाठी करण्यात यावा.

७.७ पाण्याचे परिणामकारक व्यवस्थापन, पिक व जमिनीचे विकास व्यवस्थापन उपाययोजना यासाठी आवश्यक प्रशिक्षण देण्यात यावे.

७.८ उचित तंत्रज्ञान, शेती पध्दती आणि तांत्रिक मदत यांच्या निवडीसाठी ICAR संस्था, राज्यातील कृषी विद्यापीठे, कृषी विज्ञान केंद्रे, आत्मा आणि नामांकित स्वयंसेवी संस्था यांचा सल्ला घेण्यात यावा.

७.९ संबंधित कृषी पर्यवेक्षकांनी त्यांच्या क्षेत्रातील लाभार्थीनी बसविलेल्या १००% सूक्ष्म सिंचन संचाची मोका तपासणी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “अ” मधील अनु.क्र.५ मधील नमुद कालावधीत पुर्ण करावी, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी १%, विभागीय कृषी सहसंचालक प्रतिमाह ५ संच, संचालक फलोत्पादन प्रतिमहा १ संच यांनी याप्रमाणे बसविण्यात आलेल्या संचाची मोका तपासणी करावी.

७.१० योजनेच्या योग्य संनियंत्रणासाठी विभागीय स्तरावर पथक निर्माण करावेत व या पथकामार्फत कमीत कमी ५% आंतरविभागीय मोका तपासणीची पुनर्पडताळणी करण्यात यावी. यासाठी लागणारी वहाने भाडेतत्वावर घेण्यात यावीत व यासाठीचा खर्च केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे प्रशासकीय निधी वापरुन करावा.

७.११ मार्गदर्शक सूचनामधील तरतुदी व मानकांनुसार शेतकऱ्यांचे उपकरणे बसविलेली आहेत यांची खातरजमा केल्यानंतरच अनुदानाची रक्कम अदा करण्यात यावी.

७.१२. संपूर्ण राज्यातील जिल्हानिहाय लाभार्थ्यांची यादी आयुक्तालय स्तरावर एकत्रित करुन राज्य शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी. मंजूर अनुदानापैकी कमीत कमी ५०% अनुदान अल्प व अत्यल्प भूधारक प्रवर्गातील शेतकऱ्यांसाठी वापरण्यात यावे. ३० % लाभार्थी महिला असाव्यात (अल्प व अत्यल्प प्रवर्गातील महिला १५% व इतर प्रवर्गातील १५%) अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीसाठी उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच प्रवर्गासाठी वापरण्यात यावा.

७.१३. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत पाणी व्यवस्थापण बाबी उप घटकाची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणीच्या अनुषंगाने संचालक, फलोत्पादन यांनी शासन मान्यतेने सविस्तर कार्यपद्धती विहीत करावी.

७.१४. पाणी व्यवस्थापण बाबी उप घटकाचा लाभ दिलेल्या वैयक्तिक लाभार्थ्यांस किंवा सामुदायिक/ सार्वजनिक बाबीच्या क्षेत्रातील लाभार्थ्यांस सूक्ष्म सिंचनाचा लाभ प्राधान्याने देण्यात यावा.

७.१५ लाभार्थ्यांची यादी व त्यांना देण्यात आलेले अनुदान याबाबतची माहिती ग्रामपंचायतीच्या फलकावर दर्शनी भागावर लावण्यात यावी. त्याचप्रमाणे शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करावी.

७.१६ योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

७.१७ प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजनेच्या संकेत स्थळावर मंजूर वार्षिक कृति आराखडा प्रसिध्द करण्यात यावा. त्याचप्रमाणे प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती केंद्र शासनाच्या MIS प्रणालीमध्ये प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत अद्ययावत करण्यात यावी.

७.१८ जनजाती उपयोजना (TSP) आणि अनुसूचित जाती उपयोजना (SCSP) या घटकांच्या भौतिक आणि आर्थिक प्रगती बाबतची माहिती कृषी व सहकार विभागास विहित प्रपत्रात कृषी मंत्रालय, भारत सरकार तसेच राज्य शासनाकडे सादर करण्यात यावी.

७.१९ सुक्ष्म सिंचन संचांना पूर्वमान्यता ही जिल्ह्याला मंजूर लक्षांकाच्या मर्यादेत देण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत त्या वर्षाच्या अनुदानापेक्षा जास्त रकमेच्या प्रस्तावांना मान्यता देवून अतिरिक्त दायित्व निर्माण करु नये. आर्थिक वर्षात पूर्वमान्यता दिलेले प्रस्ताव प्रलंबित राहिल्यास संबंधित जिल्हा अधिक्षक, कृषी अधिकारी यांना जबाबदार धरुन त्यांचेविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

७.२० राष्ट्रीय फलोत्पादन अभियान, राष्ट्रीय कृषी विकास योजना आणि इतर योजनांमधून सुक्ष्म सिंचन संचासाठी दिलेल्या अनुदानासाठी स्वतंत्र लेखापुस्तक ठेवण्यात यावे.

७.२१ योजनेचा लाभ घेणऱ्या लाभार्थ्यांने अर्जावर त्याचे छायांकित लावणे बंधनकारक करण्यात यावे.

७.२२ संपूर्ण राज्यातील जिल्हा निहाय लाभार्थ्यांची यादी आयुक्तालय स्तरावर एकत्रित करुन राज्य शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

७.२३ शेतकऱ्यांना पुरविण्यात आलेल्या सुक्ष्म सिंचन साहित्याच्या गुणवत्तेच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमधील परिच्छेद १७ नुसार कार्यवाही अवलंबिण्यात यावी.

७.२४ सदर योजनेकरिता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्ह्यात करण्याकरिता उपरोक्त सर्व सूचना/ अटी समाविष्ट करुन मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याकरिता संचालक (फलोत्पादन), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. अनुदान वाटपाची कार्यवाही चालू आर्थिक वर्षातच पूण करण्यात यावी.

७.२५ मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी कृषी संचालक, फलोत्पादन, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला निधी आहरित व संवितरीत करण्याचे अधिकार कृषी आयुक्तालय स्तरावर सहाय्यक संचालक,लेखा-१, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७.२६ सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३,दि.२ एप्रिल, २०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर शासन परिपत्रकातील अटींची पूर्तता करुन मा.अपर मुख्य सचिव (कृषी) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१८०६२०१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.06.19 18:08:43 +05'30'

( श्रीकांत आंडगे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
११) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे

१२) संशोधन संचालक, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी
१३) संशोधन संचालक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
१४) संशोधन संचालक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१५) संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
१६) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१७) संचालक, कृषी हवामान शास्त्र विभाग, पुणे.
१८) भारतीय हवामान शास्त्र विभाग, पुणे.
१९) विभाग प्रमुख, एकात्मिक जल व्यवस्थापन, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
२०) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
२१) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापिठ, परभणी
२२) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापिठ, दापोली
२३) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठ, अकोला
२४) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
२५) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
२६) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/
२७) सर्व मंडळ कृषी अधिकारी
२८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
३०) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
३१) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
३२) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
३३) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
३४) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण /नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
३५) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
३६) निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक सुसिंयो-०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४-अे, दि. १९ जून, २०१८ सोबतचे**

**परिशिष्ट - अ**

**प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत कार्यवाहीचे टप्पे व कालमर्यादा**

| अ.क्र. | कार्यवाहीचे टप्पे | जबाबदार अधिकारी/ व्यक्ती | कालावधी |
|---|---|---|---|
| १ | जिल्हानिहाय आर्थिक व भौतिक लक्षांक वाटप करणे व वेळोवेळी निधी वितरण करणे. | संचालक (फलोत्पादन) | शासनाकडून अनुदान वितरीत झाल्यानंतर २ दिवसात. |
| २ | तालुका कृषि अधिकाऱ्यांना आर्थिक व भौतिक लक्षांक वाटप करणे. | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संचालक (फलोत्पादन) यांच्याकडुन लक्षांक प्राप्त झाल्यांनतर ७ दिवसात |
| ३ | अर्जदाराने पुर्वसंमतीच्या दिनांकापासून सूक्ष्म सिंचन संचाची ३० दिवसात उभारणी करणे व तद्नंतर अनुदानाचा प्रस्ताव ऑनलाईन प्रणलीद्वारे सादर करणे. | पुर्वसंमती प्राप्त शेतकरी | शेतकऱ्यांनी सूक्ष्म सिंचन संचाची उभारणी करुन बील इनव्हाईस व अनुदानाचा प्रस्ताव आवश्यक अभिलेखांच्या प्रतीसह ऑनलाईन प्रणालीद्वारे ३० दिवसांच्या आत सादर करणे. |
| ४ | शेतकऱ्यांनी ऑनलाईन सादर केलेल्या अनुदानाच्या प्रस्तावाची छाननी करुन संबंधित कृषी पर्यवेक्षकांना मोका तपासणीसाठी आदेशित करणे. | तालुका कृषी अधिकारी | शेतकऱ्यांनी अनुदानासाठी ऑनलाईन प्रस्ताव सादर केल्यापासून ७ दिवसांच्या कालावधीत |
| ५ | शेतकऱ्यांनी उभारणी केलेल्या सूक्ष्म सिंचन संचाची मोका तपासणी करणे. | कृषी पर्यवेक्षक | तालुका कृषी अधिकारी यांच्याकडून आदेश प्राप्त झाल्यानंतर १० दिवसांत |
| ६ | अनुदानाची परिगणना करुन शेतकऱ्यांना अनुदान अदा करण्यासाठीचा प्रस्ताव जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांच्याकडे शिफारशीसह ऑनलाईन सादर करणे. | तालुका कृषी अधिकारी | मोका तपासणी झाल्यानंतर कार्यालयीन कामकाजाच्या ७ दिवसात |
| ७ | तालुका कृषी अधिकारी यांच्याकडून शेतकऱ्यांना अनुदान अदा करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर अनुदानाची रक्कम शेतकऱ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात PFMS प्रणालीद्वारे जमा करणे. | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | प्रस्ताव ऑनलाईन प्रणालीवर प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या कालावधीत. |

**शासन निर्णय क्रमांक सुसिंयो-०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४-अे, दि. १९ जून, २०१८ सोबतचे**

**परिशिष्ट - ब**

प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनातील परिच्छेद-८ नुसार विविध लॅटरल आंतर व प्लॉट साईजनुसार ठिबक सिंचन संचाचे अनुदान परिगणना करण्यासाठीचे मापदंड

(मापदंड खर्च रुपये)

| लॅटरल अंतर (मिटर) | ०.४० हेक्टर | १.०० हेक्टर | २.०० हेक्टर | ३.०० हेक्टर | ४.०० हेक्टर | ५.०० हेक्टर |
|---|---|---|---|---|---|---|
| १२x१२ | १५८५३ | २१६४३ | ३४४१७ | ५३४३७ | ६६४८० | ८४६५३ |
| १०x१० | १६४१९ | २३०४७ | ३७१७१ | ५७६४७ | ७२२०५ | ९१८०६ |
| ९x९ | १६८२६ | २४०३५ | ३९१४५ | ६०६१० | ७६२३८ | ९६८५२ |
| ८x८ | १७३५१ | २५३३२ | ४१६५० | ६४५०० | ८१५२७ | १०३४५९ |
| ६x६ | १९०९६ | ३०५३४ | ५१०४५ | ८२४७२ | १०००१६ | १२५४९८ |
| ५x५ | २०६७४ | ३४६६४ | ५९१५४ | ८५४८४ | १०८६३५ | १४५९६४ |
| ४x४ | २१४१४ | ३६५६२ | ६४०८४ | ९९९६५ | १३०८८४ | १५५७७८ |
| ३x३ | २३०५५ | ४२०३४ | ७२७५९ | ११२०६५ | १४०९३६ | १७६४५७ |
| २.५x२.५ | ३११५६ | ६००६५ | १०९३४५ | १६७०११ | २३४३९६ | २८६२९७ |
| २x२ | ३६३५८ | ७३१३८ | १४१९५७ | २०६२३२ | २८६५०४ | ३५१६६७ |
| १.५x१.५ | ४१३६९ | ८५६०३ | १६३१३७ | २४३६३३ | ३३६४८४ | ४१४००२ |
| २.५x०.६ | ३०८१० | ६३१४५ | ११६०४२ | १७७३४५ | २४६२७६ | ३०२३१८ |
| १.८x०.६ | ३७८४५ | ८०५९९ | १५२५५१ | २२९६३७ | ३१२७८४ | ३८९५११ |

**शासन निर्णय क्रमांक सुसिंयो- ०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे, दि. १९ जून, २०१८ सोबतचे**

**परिशिष्ट - क**

सन २०१७-१८ च्या केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनातील परिच्छेद-११ नुसार तुषार सिंचन संचाचे अनुदान परिगणना करण्यासाठीचे मापदंड

**(मापदंड खर्च रुपये)**

**चल स्प्रिंकलर (पोर्टेबल)**

| **क्षेत्र (हे)** | **६३ मी.मी.** | **७५ मी.मी.** | **९० मी.मी.** |
|---|---|---|---|
| १.०० हे.पर्यंत | १९५४२ | २१९०१ | ० |
| २.०० हे.पर्यंत | २८२१३ | ३१३७२ | ० |
| ३.०० हे.पर्यंत | लागू नाही | लागू नाही | ४२३४५ |
| ४.०० हे.पर्यंत | लागू नाही | लागू नाही | ५३४०४ |
| ५.०० हे.पर्यंत | लागू नाही | लागू नाही | ६०४५९ |

**मायक्रो स्प्रिंकलर**

| **क्षेत्र (हे)** | **अंतर ५द्व५ मी.** | **अंतर ३द्व३ मी** |
|---|---|---|
| ०.४० | २९६१३ | ३४६३७ |
| १.०० | ५८९३२ | ६७२२१ |
| २.०० | १०३५८१ | १२११३८ |
| ३.०० | १४९३०५ | १७२९६८ |
| ४.०० | २०१६१२ | २३८८४५ |
| ५.०० | २५४८७२ | २९०९९५ |

**मिनी स्प्रिंकलर**

| **क्षेत्र (हे)** | **अंतर १०द्व१० मी.** | **अंतर ८द्व८ मी** |
|---|---|---|
| ०.४ | ४१३६३ | ४३०२३ |
| १ | ८५२१२ | ९४०२८ |
| २ | १६००१३ | १७०११८ |
| ३ | २४२९८२ | २६३३६१ |
| ४ | ३१२७५२ | ३४४०१३ |
| ५ | ३८३१२३ | ४२५३५५ |

**सेमी पर्मनंटइरिगेशन सिस्टीम**

| **क्षेत्र** (हे) | **खर्च मर्यादा** (रुपये) |
|---|---|
| ०.४ | २२५५७ |
| १ | ३६६०७ |
| २ | ६९८०४ |
| ३ | ९४२१८ |
| ४ | १२०३९२ |
| ५ | १४६०५३ |

**लार्ज व्हालूम स्प्रिंकलर इरिगेशन सिस्टीम (रेनगन)**

| **क्षेत्र (हे)** | **६३ मी.मी.** | **७५ मी.मी.** | **९० मी.मी.** |
|---|---|---|---|
| १ | २८६८१ | ३४५१३ | लागू नाही |
| २ | लागू नाही | ४३७८६ | लागू नाही |
| ३ | लागू नाही | लागू नाही | ५६८१८ |
| ४ | लागू नाही | लागू नाही | ६५८५६ |
| ५ | लागू नाही | लागू नाही | ७२३२२ |